आदिवासी घटक कार्यक्रमातंर्गत सन २०१९-२० या वर्षाकरीता पेसा ग्रामपंचायतींकरीताच्या अबंध निधीचे वितरण...
लेखाशिर्ष (२५०१ २९७१)

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र. क्र. ०८ /का-०६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, विस्तार इमारत,मुंबई-४०० ०३२
तारीखः- १ ऑक्टोबर, २०१९

**वाचा**

१) शासन निर्णय, आ.वि.वि. क्रमांकः पेसा-२०१५/प्र.क्र.१९/का-१७ दि.२१.०४.२०१५
२) शासन शुध्दीपत्रक, आ.वि.वि. क्रमांकः पेसा-२०१५/प्र.क्र.१९/का-१७ दि.२०.०२.२०१६
३) शासन निर्णय, आ.वि.वि क्रमांकः टिएसपी-२०१७/प्र.क्र.२१९/का-०६ दि.२५.१०.२०१८
४) शासन निर्णय, आ.वि.वि क्र.पेसाअ-२०१९/प्र.क्र.८८/का-१७ दि.१९.०६.२०१९
५) शासन परिपत्रक, वि. वि, क्र.अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि. ०८.०७.२०१९

**प्रस्तावना -**

राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील ग्रामपंचायतींना आदिवासी उपयोजनेंतर्गत वार्षिक नियतव्ययाच्या ५% निधी उपलब्ध करुन देण्याबाबत संदर्भ क्र. ०१ येथील दिनांक २१.०४.२०१५ रोजीच्या शासन निर्णयान्व्ये मान्यता देण्यात आली आहे.

पेसा ग्रामपंचायतींना ५ % थेट अबंध निधी योजनेकरीता संदर्भाधीन वाचा क्र.३ येथील शासन निर्णयानुसार आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कार्यक्रम खर्चाच्या ५ टक्के निधी (अनिवार्य/बांधील खर्च वगळून) तरतुद करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. त्यानुसार सन २०१९-२० करीता या योजनेसाठी लेखाशिर्ष (२५०१ २९७१) खाली रु.२६७८८.५९ लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

जनजाति सल्लागार परिषदेच्या ५० व्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार संदर्भाधीन क्र.४ येथील शासन निर्णयान्वये सदरील योजना ग्रामविकास विभागाकडे वर्ग करण्यात आलेली आहे. त्यानुषंगाने संदर्भीत वाचा क्र. ५ येथे नमूद वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीत तरतुदीच्या ६० % च्या मर्यादेत सदर योजनेचा निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर ग्रामविकास विभागास वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय : -**

राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील ( पेसा ) ग्रामपंचायतींना ५ % थेट निधी योजना (लेखाशिर्ष २५०१ २९७१) अंतर्गत सन २०१९-२० करीता अर्थसंकल्पीत निधीच्या ६० % प्रमाणात **रु.१६०७३.१५४ लाख** (अक्षरी रुपये एकशे साठ कोटी, त्र्याहत्तर लाख, पंधरा हजार, चारशे फक्त) इतका

निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव , ग्रामविकास विभाग, तथा नियंत्रक अधिकारी यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधीन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

**अटी व शर्ती-**

१. सदर निधी अनुसुचित क्षेत्रातील गावांच्या ग्रामसभा क्षेत्रामध्ये आदिवासी लोकसंख्येच्या प्रमाणात वर्ग करण्याबाबत दक्षता घेण्यात यावी.

२. सदर योजनेंतर्गत संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित मार्गदर्शक सुचनांनुसार वितरीत निधीची उपयोगिता होत असल्याबाबतची खात्री संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी करावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र. ५ येथील शासन परिपत्रकानुसार प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये, निर्गमित करण्यात येत आहे.

४. राज्यात दि. २१.०९.२०१९ रोजी पासून घोषित आदर्श आचार संहितेचा भंग होणार नाही याबाबत संबंधित विभागाने दक्षता घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201910011322326724 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarrao Aute

Digitally signed by Ravindra Digambarrao Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarrao Aute
Date: 2019.10.01 16:54:03 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रत,

१. मा.मंत्री, आदिवासी विकास विभाग,यांचे खासगी सचिव, मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग,यांचे खासगी सचिव, मंत्रालय,मुंबई
३. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
४. प्रधान सचिव,ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.
५. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
६. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

७. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परीषद (सर्व पेसा जिल्हे)
५. सहसचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०. कक्ष अधिकारी (कार्यासन-१७) / लेखाधिकारी (रोखशाखा), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.